**शासकीय गोदामात साठवणूक केलेल्या अन्नधान्यावर आवश्यकतेनुसार धुरीकरण करण्यासाठी धुरीकरणाचे कंत्राट निश्चिती साठी निविदा प्रक्रिया राबविण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांक- कंत्राट १२१५/प्र.क्र.२१/ना.पु.१६-अ**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २१ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा** :-शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक- फवारा-१००१/प्र.क्र.५२१५/नापु.१६-अ, दिनांक :- १७ मे, २०१२.

**प्रस्तावना** :-

राज्यातील शासकीय गोदामात साठवणूक केलेल्या अन्नधान्याला कीड लागून त्यांची नासाडी होऊ नये. तसेच धान्याची प्रत टिकून राहावी यासाठी राज्यातील विविध जिल्ह्यातील शासकीय गोदामातील तसेच मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रातील शासकीय गोदामातील अन्नधान्यावर धुरीकरण करण्यासाठी विहित निविदा प्रक्रियेअंती कंत्राट निश्चित करण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये आदेश देण्यात आले आहेत.

सन २०१३-२०१४ ची निविदा प्रक्रिया राबविण्याबाबतची कार्यवाही सद्यस्थितीत शासनाच्या विचाराधीन आहे. निविदा प्रकिया राबविताना येणाऱ्या अडचणी विचारात घेता ही निविदा प्रक्रिया संचालक, नागरी पुरवठा यांच्याऐवजी प्रत्येक महसूली विभागासाठी विभागीय आयुक्त कार्यालयाकडून राबविण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णयात दुरुस्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक** :-

संदर्भाधीन शासन निर्णयातील परिच्छेद ६ पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे :-

६. सहा महसुली विभागाकरीता व मुंबई / ठाणे शिधावाटप क्षेत्राकरीता खुल्या निविदा मागविण्याचे पूर्ण अधिकार संबंधित विभागीय आयुक्त यांना राहतील. मात्र मर्यादित / एकेरी निविदा मागविण्यापूर्वी शासनाची पूर्व परवानगी आवश्यक राहील.

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०२२११६११५५२९०६ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2015.02.21 16:21:03 +05'30'

**( सतीश सुपे )**

उप सचिव,

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,

**प्रति,**

१. संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.

२. संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
३. सर्व जिल्हाधिकारी.
४. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
५. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, (विसवउस मार्फत)
११. नियंत्रक, शिधावाटप, मुंबई
१२. निवडनस्ती (ना.पु.१६-अ)

-----------